महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाचे इंग्रजी भाषेतील नांव Maharashtra State Handicapped Finance & Development Corporation ऐवजी Maharashtra State Finance & Development Corporation for persons with disability असे करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपंग-२०१५/प्र.क्र.१५६/महामंडळे**
मंत्रालय, विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्र.इडीडी-२००१/ प्र.क्र.६५/सुधार-३, दि.२१ नोव्हेंबर, २००१.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मर्या. यांचे पत्र, क्र.अविविम/प्र.क्र.७८१/२०१५/२३३, दि.१५ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

राज्यातील अपंग व्यक्तींच्या आर्थिक विकासासाठी शासनाने महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाची स्थापना केली आहे. मुख्य आयुक्त, अपंग कल्याण, नवी दिल्ली यांचेसमवेत तत्कालिन सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय यांची दि.२७ ऑगस्ट, २०१४ रोजी बैठक झाली. सदर बैठकीत Handicapped ऐवजी Person with disability असा उल्लेख महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाच्या इंग्रजी नावामध्ये करावा असे निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुसार सदर महामंडळाचे इंग्रजी भाषेतील नांव Maharashtra State Handicapped Finance & Development Corporation ऐवजी Maharashtra State Finance & Development Corporation for persons with disability असे करण्यास मान्यता दिली आहे. यास्तव सदरहू महामंडळाच्या नांवात बदल करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाचे इंग्रजी भाषेतील नांव Maharashtra State Handicapped Finance & Development Corporation ऐवजी Maharashtra State Finance & Development Corporation for persons with disability असे करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३ फेब्रुवारी, २०१३ च्या परिपत्रकाच्या निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१११९४४८१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sharad Ranade

Digitally signed by Smita Sharad Ranade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=421201, st=Maharashtra, cn=Smita Sharad Ranade
Date: 2015.10.30 11:22:24 +05'30'

**( स्मि.श.रानडे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ (मर्या.), मुंबई.
८. राष्ट्रीय मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अप्पर कोषागार अधिकारी, कोकणभवन, नवी मुंबई.
१४. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, पाचवा मजला, मुंबई.
१६. निवडनस्ती (महामंडळे).